राष्ट्रीय निवृत्तिवेतन योजनेच्या वर्गणीमधुन अंशत: रक्कम आहरित करणेबाबत सूचना (Partial Withdrawal )

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : -अंनियो-२०२१/प्र.क्र.१९/सेवा-४**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक : ०८ ऑक्टोबर २०२१**

**संदर्भ** : १) निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण अधिसूचना क्र. पीएफआरडीए/१२/आरजीएल/१३९/८, दिनांक १०/०८/२०१७ (Exits and Withdrawals under the National Pension System) ( First Amendment) Regulations, 2017

२) निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण परिपत्रक क्र. पीएफआरडीए/२०१८/४०/EXIT ,दि. १०/०१/२०१८

३) निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण परिपत्रक क्र. पीएफआरडीए/२०२०/७/REG- EXIT / १, दिनांक ०९/०४/२०२०.

**शासन परिपत्रक :-**

राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेच्या सभासदांना त्यांच्या सेवा कालावधीत अंशत: रक्कम काढण्याची (Partial Withdrawal) सविस्तर कार्यपध्दती निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण यांनी त्यांच्या संदर्भाधीन क्र.१ च्या अधिनियमानुसार तसेच संदर्भाधीन क्र. ३ च्या परिपत्रकान्वये विहित केलेली आहे. त्यानुसार खालील तरतुदी विभागांच्या निदर्शनास आणून देण्यात येत आहेत:-

२. राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत कर्मचाऱ्यांना त्यांच्या स्वत:च्या जमा अंशदानाच्या रकमेपैकी फक्त २५% रक्कम निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण ( PFRDA ) यांनी वेळोवेळी निर्गमित केलेल्या परिपत्रकानुसार खालील कारणांकरिता काढता येईल.

क) स्वत:च्या किंवा दत्तक मुलगा / मुलगी यांच्या उच्च शिक्षणाकरिता.

ख) स्वत:च्या किंवा दत्तक मुलगा / मुलगी यांच्या विवाहाकरिता.

ग) कर्मचाऱ्याच्या स्वत:च्या किंवा वैवाहिक जोडीदाराच्या नावे घर खरेदीकरिता. (तथापि कर्मचाऱ्याच्या स्वत: च्या किंवा वैवाहिक जोडीदाराच्या नावे एखादे घर असेल तर अशा कर्मचाऱ्यास या प्रयोजनासाठी रक्कम काढता येणार नाही.)

घ) निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण यांची उपरोक्त दिनांक १०/०८/२०१७ ची अधिसूचना व दिनांक ०९/०४/२०२० च्या परिपत्रकात नमूद केल्यानुसार राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजनेचा सभासद, सभासदाचा कायदेशीर वैवाहिक जोडीदार/मुले/दत्तक मुले/अवलंबून असलेले आई - वडील यांच्या खालील गंभीर आजारासाठी (वैद्यकीय प्रमाणपत्राच्या आधारे) अशंत: रकमेचे आहरण अनुज्ञेय आहे.

१) कर्करोग (Cancer)
२) मूत्रपिंड निकामी होणे (Kidney Failure - End Stage Renal Failure)
३) प्राथमिक पलमनरी धमनी उच्च रक्तदाब (Primary Pulmonary Arterial Hypertension)
४) एकाधीक स्क्लेरोसिस (Multiple Sclerosis)

५) प्रमुख अवयव प्रत्यारोपण (Major Organ Transplant)
६) कोरोनरी आर्टरी बायपास कलम (Coronary Artery Bypass Graft)
७) महाधमनी कलम बायपास शस्त्रक्रिया (Aorta Graft Surgery)
८) हदय झडप शस्त्रक्रिया (Heart Valve Surgery)
९) स्ट्रोक (Stroke)
१०) हदय स्नायुमध्ये रक्ताची गुठळी होणे (Myocardial Infarction)
११) कोमा (Coma)
१२) संपूर्ण अंधत्व (Total Blindness)
१३) कोविड-१९ (Covid-१९)
१४) अर्धांगवायू (Paralysis)
१५) गंभीर जीवघेणी दुर्घटना (Accident of Serious/life threatening nature)
१६) या व्यतिरिक्त PFRDA यांच्याकडून यापुढे निर्गमित होणाऱ्या परिपत्रकानुसार अन्य गंभीर आजारासाठी (Any other Critical illness of life threatening nature as stipulated in the circulars, guidelines or notifications issued by the PFRDA from time to time)

३) राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत कर्मचाऱ्यांस त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून ३ वर्षाचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर केवळ कर्मचाऱ्यांच्या जमा अंशदानाच्या संचित राशीतून रक्कम आहरण करता येईल.

४) कर्मचाऱ्यास त्यांच्या संपूर्ण सेवेच्या कालावधीत जास्तीत जास्त ३ वेळा अंशत: रक्कम आहरण करता येईल.

५) शासकीय कर्मचाऱ्यांनी अंशत: रक्कम काढण्यासाठी लेखी अथवा ऑनलाइन अर्ज त्यांच्या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना सादर करावा. अर्जासोबत आवश्यक कागदपत्रे स्वसाक्षांकित करून जोडावी.

६) आहरण व संवितरण अधिकारी यांनी अशंत: रक्कम काढण्याचा कर्मचाऱ्याचा अर्ज प्राप्त झाल्यानंतर ३ दिवसात त्याची छाननी करावी. मागणी नियमानुसार असल्यास असा अर्ज आवश्यक कागदपत्रासह ऑनलाईन अधिदान व लेखा कार्यालय /कोषागार कार्यालय यांचेकडे सादर करावा.

७) अधिदान व लेखा कार्यालय/कोषागार कार्यालय यांनी सदर अर्जाची ३ दिवसात छाननी पूर्ण करावी व मागणी अर्ज नियमानुसार असल्यास निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण (NSDL) यांना ऑनलाईन सादर करावा. अन्यथा प्रकरण आक्षेपित करून परत करावे.

अ) **प्रतिनियुक्तीवरील कर्मचाऱ्यांसाठी :-**

प्रतिनियुक्तीवरील कर्मचाऱ्यांनी त्यांचा अर्ज, सेवा संवर्ग नियंत्रित करणाऱ्या विभाग प्रमुखांस / त्यांचे सेवा पुस्तक ज्या कार्यालय प्रमुखाच्या कक्षेत असते त्या कार्यालयास सादर करावा.सदर कार्यालय प्रमुखांनी उपरोक्त नमुद कार्यपध्दतीप्रमाणे उचित कार्यवाही करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२११००८१४४१०२८६०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

RAMAKANT SHIVAJIRAO GHATGE

Digitally signed by RAMAKANT SHIVAJIRAO GHATGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=927f16b596a85f3f04b621916641eefd1bb6b4367c467eb0b061a30ce41ba8ec, pseudonym=AD5BA171C660951BA0BF959863A4808251FBFD58, serialNumber=175D8C74402686B296B9A00D70E6C51C0711C360974050D297FD3F96075BFCAE, cn=RAMAKANT SHIVAJIRAO GHATGE
Date: 2021.10.08 14:43:14 +05'30'

**(र.शि.घाटगे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
२) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
३) महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
४) महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
६ ) सह संचालक, लेखा व कोषागारे, कोकण/पूणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
७) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई,
८) संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,
९ ) संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण भवन, नवी मुंबई.
१०) सह संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर.
११) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
१२) सर्व कोषागार अधिकारी,
१३) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
१४) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
१५) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
१६) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
१७) सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
१८) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
१९) प्रबंधक, उच्च न्यायालय (मुळ न्याय शाखा) मुंबई,
२०) प्रबंधक, उच्च न्यायालय ( अपील शाखा ) मुंबई,
२१) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
२२ ) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
२३) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
२४) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई/नागपूर/औरंगाबाद
२५) मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.
२६) आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)
२७) सचिव, राज्य निवडणूक आयोग,
२८) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग,

२९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०००३२.
३०) सर्व मंत्रालयीन विभाग
३१) मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
३२) सर्व विभागीय आयुक्त,
३३) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
३४) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
३५) संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे,
३६) संचालक (तंत्र शिक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३७) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३८) संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई,
३९) कुल सचिव, सर्व कृषि व कृषितर विद्यापीठे,
४०) वित्त विभागातील सर्व कार्यासने,
४१) निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.